**अमरावती महानगरपालिकेची सुधारित विकास योजना तयार करण्यासाठी उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक कार्यालय, अमरावती महानगरपालिका, अमरावती येथे स्थलांतरित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.विघयो-३८१५/२१/प्र.क्र.१०१/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ६ जून, २०१५.

संदर्भ :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-२३१०/प्र.क्र.१९३/नवि-२७, दि.०९ जून, २०११.
२. नाशिक महानगरपालिका, नाशिक यांचे पत्र क्र.२२०, दि.१२.१२.२०१४.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.वियोविघ/नाशिक-अमरावती/अर्थसंकल्प/४९, दि.०३.०१.२०१५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २६ अन्वये नाशिक महानगरपालिकेचा प्रारुप सुधारित विकास आराखडा प्रसिद्ध करण्यासाठी (सुचना व हरकती मागविण्याकरिता) नगर विकास विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.०९.०६.२०११ च्या शासन निर्णयान्वये उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक या कार्यालयाची स्थापना करण्यात आली होती. तद्नंतर, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २१ (४) च्या तरतुदीनुसार संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.प्रावियो/नाशिक/निअ/मुदत/टिपीव्ही-४/६३९०, दि.०२.१२.२०१३ अन्वये सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक यांची "नियुक्त अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. या नियुक्त अधिकाऱ्यांमार्फत नाशिक महानगरपालिकेचा प्रारुप सुधारित विकास आराखडा प्रसिद्ध करण्याचे काम सुरु आहे. त्यामुळे उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक या कार्यालयाकडे कोणतेही काम शिल्लक नसल्याने सदरचे कार्यालय अन्यत्र स्थलातंरित करण्याबाबत नाशिक महानगरपालिकेने त्यांच्या **संदर्भ-२** येथील दि.१२.१२.२०१४ च्या पत्रान्वयेविनंती केलेली आहे.

०२. अमरावती शहराची वाढत असलेली लोक संख्या, पुरविण्यात येणाऱ्या सुविधा विचारात घेता, शहराच्या विकासाचा कल सुसंबध व रचनात्मकरित्या करण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २३/१ व ३८ मधील तरतूद विचारात घेता कलम २४ अ नुसार अमरावती महानगरपालिकेची सुधारित विकास योजना तयार करण्यासाठी महानगरपालिकेने त्यांच्या दि.१९ जानेवारी, २०१३ रोजीच्या महासभेत ठराव क्रमांक ६ पारित करुन उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटकाची मागणी केलेली आहे.

०३. सबब, उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक हे कार्यालय अमरावती महानगरपालिका, अमरावती येथे स्थलातंरित करण्याची बाब विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

अमरावती शहराची वाढत असलेली लोकसंख्या व पुरविण्यात येणाऱ्या सुविधा विचारात घेता, विकासाचा कल सुसंबंध व रचनात्मकरित्या करण्याच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २३/१ व ३८ मधील तरतूद विचारात घेता कलम २४ अ नुसार अमरावती महानगरपालिकेची सुधारित विकास योजना तयार करण्यासाठी, उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक यांचे कार्यालय पुढील तक्त्यात नमूद केलेल्या १५ पदांसह अमरावती महानगरपालिका, अमरावती यांच्याकडे **दि.१५ जून, २०१५ (म.नं.)** पासून स्थलातंरित करण्यास या आदेशान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदांचे नांव | सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनसंरचना (रुपयात) | ग्रेड वेतन रुपयात | एकूण पदे | स्थाय / अस्थायी |
|---|---|---|---|---|---|
| १ | उप संचालक, नगर रचना (राजपत्रित / गट-अ) | रु.१५,६००-३९,१००. | ७,६०० | १ | अस्थायी |
| २ | नगर रचनाकार (राजपत्रित / गट-अ) | रु.१५,६००-३९,१००. | ५,४०० | १ | अस्थायी |
| ३ | सहाय्यक नगर रचनाकार (गट-ब) | रु. ९,३००-३४,८००. | ४,४०० | २ | अस्थायी |
| ४ | उच्चश्रेणी लघुलेखक | रु. ९,३००-३४,८००. | ४,४०० | १ | अस्थायी |
| ५ | रचना सहायक | (i) रु.९,३००-३४,८००. | ४,३०० | ३ | अस्थायी |
| | | (ii) रु.९,३००-३४,८००. (५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर सहाय्यक नगर रचनाकार) | ४,४०० | | |
| ६ | वरिष्ठ लिपिक | रु.५,२००-२०,२००. | २,४०० | १ | अस्थायी |
| ७ | कनिष्ठ आरेखक | (i) रु.५,२००-२०,२००. | २,४०० | २ | अस्थायी |
| | | (ii) रु.९,३००-३४,८००. (५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | ४,२०० | | |
| ८ | अनुरेखक | (i) रु.५,२००-२०,२००. | २,००० | २ | अस्थायी |
| | | (ii) रु.५,२००-२०,२००. (७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | २,४०० | | |
| ९ | कनिष्ठ लिपिक | रु.५,२००-२०,२००. | १,९०० | १ | अस्थायी |
| १० | शिपाई | रु.४,४००-७,४४०. | १,३०० | १ | अस्थायी |
| | | | **एकूण :-** | **१५** | |

**०२.** अमरावती महानगरपालिका, अमरावती यांनी त्यांच्या दि.१९.०१.२०१३ रोजीच्या महासभेत ठराव क्रमांक ६ पारित झाल्यानुसार प्रस्तावित विकास योजना, विशेष घटकाकरिता वेतन व भत्ते, कार्यालयास जागा, वाहन, दूरध्वनी, संगणक, स्टेशनरी, फर्निचर इत्यादी बाबींवरील खर्च अमरावती महानगरपालिकेच्या निधीमधून (Funds) करण्यात यावा.

**०३.** उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक या कार्यालयाकरिता **१८** अस्थायी पदांचा आकृतीबंध मंजूर आहे. या १८ अस्थायी पदांना नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.मुदवा-१६१५/४६/प्र.क्र.०९/नवि-२७, दि.०४ मार्च, २०१५ अन्वये दि.०१.०३.०२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीकरिता यापूर्वीच मुदतवाढ देण्यात आलेली आहे. उक्त मंजूर १८ पदांपैकी सध्या

उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, अमरावती महानगरपालिका, अमरावती या घटकास उपलब्ध करण्यात येत असलेल्या १५ अस्थायी पदांना पूर्वी देण्यात आलेली मुदतवाढ उक्त कालावधीपर्यंत चालू राहील.

०४. उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक यांच्या कार्यालयातील मंजूर कर्मचारी वर्ग उप संचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, अमरावती महानगरपालिका, अमरावती यांच्या कार्यालयाकडे वर्ग करण्याची कार्यवाही संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्यास्तरावर तात्काळ करावी. तसेच, सध्या या विकास योजना, विशेष घटकासाठी मंजूर असलेल्या १५ पदांपैकी रिक्त असलेल्या पदांवर अधिकारी / कर्मचारी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यात यावी.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०६०६१५५८२९७४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: CN = Siddharam K Salimath, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.06 16:00:23 +05'30'

**(सिद्धाराम सालीमठ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
३. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
४. जिल्हाधिकारी, नाशिक / अमरावती.
५. आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
६. आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
७. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(पाच प्रतीसह).**
८. संचालक, नगर रचना व सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.
१०. सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती.
११. उप संचालक, नगर रचना, विशेष योजना, विशेष घटक, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
१२. उप संचालक, नगर रचना, विशेष योजना, विशेष घटक, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक / अमरावती.
१४. कक्ष अधिकारी (नवि-०४ / नवि-२६ / नवि-३०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती / नवि-२७.

*****